आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) करिता केंद्र हिश्श्याचा सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाकरीताचा निधी सन २०१९-२० च्या तरतूदीतून वितरीत व खर्च करण्यास मान्यता.

**(लेखाशिर्ष २५०५ २९९२)**

महाराष्ट्र शासन

**आदिवासी विकास विभाग**

शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१९/ प्र. क्र.८/ कार्यासन.६

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०००३२

दिनांक:- २८ जानेवारी,२०२०.

**वाचा -**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१९ /प्र.क्र.४४/ अर्थ-३, दि.१.०४.२०१९.

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१९ /प्र.क्र.९२/ अर्थ-३, दि.८.०७.२०१९.

3) केंद्र शासन, ग्राम विकास मंत्रालयाचे पत्र,क्र.J-125025/01/2015-RH(A/C)-6/B, दि.27.03.2018.

४) ग्राम विकास विभागाची नस्ती, क्र. प्रआयो- २०१८/ प्र.क्र.३३७ /यो-१०.

**शासन निर्णय:-**

केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) करिता आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी केंद्र हिस्स्याकरीता मागणी क्र.टी-५, २५०५-ग्रामीण रोजगार, ६०-इतर कार्यक्रम, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) (०५) प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) (केंद्र हिस्सा) (२५०५ २९९२), ३३-अर्थसहाय्य या लेखाशीर्षाखाली रू.२९७२६.७५ लाख इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.

२. केंद्र शासनाने संदर्भाधीन क्र.३ येथील पत्रान्वये प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) या योजनेंतर्गत अनुसूचित जमाती प्रवर्गाचा सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाचा दुसऱ्या हप्त्याचा रु.१८७६.११० लाख इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. त्यानुषंगाने ग्राम विकास विभागाच्या उपरोक्त वाचा क्र.४ येथील नस्तीमध्ये प्रस्तावित केल्यानुसार प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) या योजनेकरीता (२५०५ २९९२), ३३-अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखाली रु.१८७६.११० लाख (अक्षरी रूपये अठरा कोटी शहात्तर लाख अकरा हजार फक्त) इतका निधी प्रशासकिय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग यांना वितरीत करण्यास व खर्च करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

३. सदर निधी अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. संबंधित नियंत्रक अधिकारी/ प्रशासकिय विभागप्रमुख यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्ट्ये इ. माहिती, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; आदिवासी विकास विभाग तसेच ग्राम विकास विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत सूचना देण्यात यावी.

४. नियंत्रक अधिकारी/ विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात व आदिवासी घटक कार्यक्रम क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची

दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांनाच लाभ देण्यात येईल याची दक्षता घ्यावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाने **वाचा** येथील क्रमांक १ व २ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४३६/ अर्थोपाय व क्र.४७७/व्यय-१५, दि.११.१२.२०१९ अन्वये दर्शविलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१२४१५२६३४१८२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kiran Kisanrao Pawar

Digitally signed by Kiran Kisanrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, cn=Kiran Kisanrao Pawar
Date: 2020.01.28 15:45:15 +05'30'

( किरण कि.पवार )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
३. संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामिण गृहनिर्माण, ४ था मजला,दक्षिण कक्ष, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई-४०० ६१४.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
५. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प (सर्व).
६. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९ ), मंत्रालय, मुंबई.
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. अवर सचिव/ कार्यासन अधिकारी (का-१७/ का-२), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवड नस्ती (का.६).